**राजोली येथील विश्रामगृहाचे नुतनीकरणाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.४१८/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १४ डिसेंबर, २०१६**

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/५६९/२०१६-१७, दि. २९.९.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर वनवृत्तामधील साकोली वनपरिक्षेत्रातील राजोली येथील विश्रामगृहाचे नुतनीकरणाच्या रू. ३२,११,९००/- रकमेच्या अंदाजपत्रकास सहमती देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर वनवृत्तामधील साकोली वनपरिक्षेत्रातील राजोली येथील विश्रामगृहाचे नुतनीकरणाच्या रू. ३३,६४,४९०/- रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व खालील अटींच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे.

१. प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा, सविस्तर नकाशे व आराखडे शासनाच्या वास्तुशास्त्रज्ञाकडून मंजूरी करून घेण्यात यावे.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
३. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.
४. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. वनसंवर्धन कायदा १९८० व वनांशी निगडीत इतर कायदे/नियम यांचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१४१५०८५३९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijaykumar Vasudeo Patil

Digitally signed by Vijaykumar Vasudeo Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1fa488256513b9e2a5b0085040486cc2b67ff77bb697c031c8d3ba4aaf6e350, cn=Vijaykumar Vasudeo Patil
Date: 2016.12.14 15:13:42 +05'30'

**(वि.वा.पाटील)**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
४. उपवनसंरक्षक, चंद्रपूर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)